संवर्ग संख्या निश्चिती : दि.१.४.२०१६. मुख्य अभियंता (स्थापत्य), अधीक्षक अभियंता (स्थापत्य) व कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्ग.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. संवर्ग-२०१६/प्र.क्र. १७५ /आस्थापना-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:-१६ डिसेंबर, २०१६

वाचा :-

१. शासन निर्णय सा.बां.विभाग क्र.संवर्ग-२०१६/प्र.क्र.१७५/आस्थापना-१, दिनांक १४ ऑक्टोंबर २०१६.
२. शासन निर्णय, गृह विभाग क्रमाक पीएचसी १२१५/प्र.क्र.५७५/पोल-७ दिनांक १० नोव्हेंबर २०१६.
३. शासन निर्णय आदिवासी विकास विभाग,क्र. शाआशा २०१५/ प्र.क्र.९८/का.-१३ दिनांक १४ जुलै २०१६.

प्रस्तावना :-

सार्वजनिक बांधकाम विभागांर्गत कार्यरत असलेल्या मुख्य अभियंता (स्थापत्य), अधिक्षक अभियंता (स्थापत्य) आणि कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गाच्या संवर्ग संख्या निश्चितीबाबतचा शासन निर्णय दि.१४.१०.२०१६ अन्वये निर्गमीत केला आहे. तथापि गृह विभागाने उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या दिनांक १०.११.२०१६ च्या शासन निर्णयान्वये पोलीसासाठी मोठ्या प्रमाणात निवासस्थाने बांधण्यासाठी महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळास असलेली मनुष्यबळाची आवश्यकता विचारात घेऊन अधिक्षक अभियंता (स्थापत्य) संवर्गात ७ पदे महामंडळाच्या आस्थापनेवर निर्माण करून सदर पदे सार्वजनिक बांधकाम विभागाकडुन प्रतिनियुक्तीने भरण्यास मान्यता दिली आहे. त्यानुसार या विभागाच्या अधिक्षक अभियंता संवर्गाच्या प्रतिनियुक्तीने भरावयाच्या हंगामी पदामध्ये महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळाने मागणी केल्यानुसार २ पदे यापुर्वीच विभागाच्या संवर्गसंख्येत समाविष्ठ करण्यात आली आहेत. उर्वरित ५ पदांचा संवर्गसंख्येत समावेश करणेची बाब विचाराधीन आहे.

तसेच आदिवासी विकास विभागाने दि.१४.७.२०१६ च्या शासन निर्णयान्वये स्वतंत्र बांधकाम कक्ष निर्माण केला असुन त्याकरिता कार्यकारी अभियंता संवर्गातील सहायक मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हे पद निर्माण केले आहे सदर पद सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत भरण्याची मागणी केली आहे. त्यामुळे सदर पदाचा कार्यकारी अधिकारी (स्थापत्य) संवर्गाच्या संवर्ग संख्येत समावेश करणेची बाब विचाराधीन आहे.

तसेच कार्यकारी अभियंता संवर्गाच्या सध्याच्या कार्यरत संवर्ग संख्येतील कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ,पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने कार्यरत असलेल्या श्री. ओमप्रकाश वैजनाथ निला यांच्या सेवा या विभागाकडे प्रत्यावर्तीत करण्यात आलेल्या आहेत तसेच महामंडळाने अन्य अधिका-याची मागणी केलेली नाही त्यामुळे सदर पद संवर्गसंख्येतुन वगळण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

१. उपरोक्त वस्तुस्थितीनुसार दि. १४.१०.२०१६ च्या शासन निर्णया मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत असुन या मधील परिच्छेद ३ (ब) मध्ये अधिक्षक अभियंता (स्थापत्य) यांची सा.बां. विभागाच्या मंजूर आकृती बंधानुसार ४१ पदे नियमीत तसेच प्रतिनियुक्तीवरील ३३ पदे अशी एकूण संवर्ग संख्या ७४ निश्चित करण्यात आली होती आता महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळासाठी अतिरिक्त ५ तदर्थ पदे सा.बां विभागाच्या संवर्गसंख्येत समाविष्ठ करण्यात येत असून त्यानुसार अधिक्षक अभियंता (स्थापत्य) या पदाची मंजुर आकृतीबंधानुसार ४१ नियमीत व प्रतिनियुक्तीवरील हंगामी ३८ अशी एकुण ७९ संवर्गसंख्या राहील.

२. शासन निर्णय दि.१४.१०.२०१६ सोबतच्या विवरणपत्रामध्ये कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गामध्ये प्रतिनियुक्तीवरील हंगामी पदामध्ये अ.क्र २७९ वरील -महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ,पुणे॰ हे पद, महामंडळाकडून मागणी नसल्याने वगळण्यात येऊन -सहायक मुख्य अभियंता, बांधकाम व्यवस्थापन कक्ष, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई॰ हे पद नव्याने समाविष्ठ करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांचा संगणक सांकेतांक क्र २०१६१२१६१५४३५३९९१८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकीत करून निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok G Chaudhari

Digitally signed by Ashok G Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92dfcb36eb3e19a8b418253e74d5703e6259839ca647379da27173dd25272748, cn=Ashok G Chaudhari
Date: 2016.12.16 16:14:43 +05'30'

**(अशोक चौधरी)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव सा.बां.वि.मंत्रालय,मुंबई.
२. सचिव (बांधकामे / रस्ते ),सा.बां.वि.मंत्रालय,मुंबई.
३. सर्व प्रशासकीय विभाग,मंत्रालय,मुंबई .
४. महालेखापाल-१/२,लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा,महाराष्ट्र राज्य,मुंबई /नागपुर.
५. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
६. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव,सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई.
७. सर्व मुख्य अभियंते/अधीक्षक अभियंते
८. सर्व कार्यासन अधिकारी,सा.बां.वि.मंत्रालय,मुंबई.
९. कार्यासन आस्थापना-१,निवडनस्ती.